**आरोग्य संस्थाकरीता ३१ नग सी.टी.स्कॅन मशीन खरेदी करण्यास पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करण्यात आलेली तरतूद खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरवणी-२०१८/प्र.क्र. १२५/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: १६ जानेवारी, २०१९.

**संदर्भ-**

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/कक्ष-३/टे-३/ सी.टी.स्कॅन/खरेदी/२६१६-१७/१७, दिनांक २३.०३.२०१७
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/कक्ष-३/टे-३/ सी.टी.स्कॅन/खरेदी/४०९८/१७, दिनांक १८.०४.२०१७
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः खरेदी-२०१७/प्र.क्र. १०२/आरोग्य-८, दि.१५.०९.२०१७.

**प्रस्तावना –**

राज्यातील विविध आरोग्य संस्थांसाठी ३१ सी.टी.स्कॅन मशीन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता दि.१५.९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली असून सदर सी.टी.स्कॅन मशीन खरेदी करण्यासाठी सन २०१८-१९ या अर्थसंकल्पीय अधिवेशनात लेखाशिर्ष ४२१० ११०१ अंतर्गत ५२-यंत्रसामुग्री व साधनसामग्री रु.२५ कोटी इतका निधी प्राप्त झाला असून जुलै, २०१८ च्या पावासाळी अधिवेशनात रु.२५ कोटी इतकी पुरवणी मागणी मंजूर करण्यात आलेली आहे. तसेच नोव्हेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशनातही रु. २५ कोटी इतकी पुरवणी मागणी मंजूर झालेली असून एकूण रु.७५ कोटी निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन दिलेला असून त्यापैकी ७० टक्के रक्कम रु.५२.५० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक १६.५.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानूसार राज्यातील विविध आरोग्य संस्थांसाठी ३१ नग सी.टी.स्कॅन मशीन खरेदी करण्यासाठी सन २०१८-१९ या अर्थसंकल्पीय अधिवेशनात लेखाशिर्ष ४२१० ११०१ अंतर्गत ५२-यंत्रसामुग्री व साधनसामग्री रु.२५ कोटी इतका निधी व जुलै, २०१८ च्या पावासाळी अधिवेशनात रु.२५ कोटी तसेच नोव्हेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशनातही रु. २५ कोटी इतकी पुरवणी मागणी मंजूर झालेली असून एकूण रु.७५,००,००,०००/- (रु.पंचाहत्तर कोटी फक्त) निधीपैकी वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०२/०४/२०१८ नुसार ७० टक्के रक्कम रु.५२.५० कोटी (रु.बावन्न कोटी पन्नास लाख फक्त) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्या अनुषंगाने रु.५२.५० कोटी इतका निधी सी.टी.स्कॅन मशीन खरेदी करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरहू सी.टी.स्कॅन मशीनींची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात १६ नग सी.टी.स्कॅन मशीन व उर्वरित दुसऱ्या टप्प्यामध्ये खरेदी करण्यात याव्यात.

३) सी.टी. स्कॅन मशीन बसवितांना रुग्णालयांत त्यासाठी आवश्यक नागरी बांधकाम (सिव्हील वर्क) पुर्ण झाले आहे, जेथील फक्त मशीन नादुरुस्त आहे त्यांना प्राधान्य द्यावे. तसेच प्रत्येक जिल्ह्यामध्ये किमान एक सी.टी.स्कॅन मशीन उपलब्ध होईल, असे नियोजन करावे. सी.टी.स्कॅन मशीन कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध आहे, याची खातरजमा करण्यात यावी.

४) सी.टी.स्कॅन मशीनचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा

होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

५) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

६) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

७) सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात खरेदी करावयाच्या १६ नग सी.टी.स्कॅन मशीन खरेदीवरील खर्च लेखाशिर्ष मागणी क्र.आर-३ (०१) (०४) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (कार्यक्रम) ५२-यंत्रसामुग्री व साधनसामग्री (४२१० ११०१) या लेखाशिर्षांतर्गत पुरवणी मागणीद्वारे मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

८) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

९) सी.टी. स्कॅन मशीनच्या नियमित देखभाल व दुरुस्तीसाठी संबंधीत पुरवठादारासमवेत आवश्यक करार करण्यात यावा.

१०) तसेच सी.टी.स्कॅन मशीन खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

११) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

१३) संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र.४३१/२०१८/व्यव-१३, दिनांक २४.१२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११६१७०२१७८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.01.16 17:45:05 +05'30'

**( ज.स.तडवी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव

२) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे खाजगी सचिव
३) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई
५) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३) वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती (आरोग्य-८)